महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३ कअ मध्ये नव्याने समाविष्ट केलेल्या पोटकलम (३अ) प्रकरणी दाखल रिट याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे नेमलेल्या विधीज्ञाची फी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. याचिका २०१६/प्र.क्र.२१/का.१३ स,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दि. ३१ मार्च, २०१७

वाचा :-१) विधी व न्याय विभागाचे पत्र क्र. ३२२-२०१६/ई दि. १३ एप्रिल, २०१६
२) समक्रमांक दि. ८ जुलै, २०१६ चे पत्र.
३) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागाचे आदेश क्र. पुर्नवि २०१७/प्र.क्र.३४/२०१७/१७-स, दि. ३१ मार्च, २०१७.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३ कअ पोटकलम (३) नंतर पोटकलम (३अ) नव्याने समाविष्ट करण्यासंदर्भात दि. २१ जानेवारी, २०१६ रोजीच्या राजपत्रात प्रख्यापित केलेल्या अध्यादेशाला आव्हान देण्यासाठी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे विविध याचिका दाखल करण्यात आल्या आहेत. मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे ६ रिट यांचिकांमध्ये शासनाची बाजू मांडण्यासाठी ॲड. अनिल साखरे, ज्येष्ठ विधिज्ञ म्हणून उपरोक्त वाचा क्र. १ अन्वये नियुक्ती करण्यात आली आहे.

उक्त रिट याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालयात वेळोवेळी झालेल्या सुनावणीवेळी ॲड. साखरे मा. उच्च न्यायालयात उपस्थित होते.सदर सुनावणीकामी वकिल फी म्हणून त्यांनी आकारलेले व शासनास सादर केलेले वकिल फीबाबतचे शुल्क अदा करण्याची बाब सदर नस्तीवर विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३ कअ पोटकलम ३अ नव्याने समाविष्ट करण्यासंदर्भातील अध्यादेशाविरुध्द दाखल रिट याचिकांमध्ये शासनाची बाजू मांडण्यासाठी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे नियुक्त केलेले ॲड. अनिल साखरे,ज्येष्ठ विधीज्ञ यांनी सादर केलेल्या देयकाच्या अनुषंगाने वाचा येथील क्र. ३ अन्वये पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध निधीमधून त्यांचे वकिल फीचे शुल्क खालीलप्रमाणे अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विधिज्ञाचे नांव | सादर केलेल्या देयकाची रक्कम (रुपये) | १०% आयकराची रक्कम (रुपये) | आयकर रकमेवर ३% शिक्षण निधी | कपातीची एकूण रक्कम रकाना क्र. ४ +५ | एकूण देय रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६ | |
| १. | ॲड. अनिल साखरे | ११,२०,०००.०० | १,१२,०००.०० | ३३६०.०० | १,१५,३६०.०० | १०,०४,६४०.०० |

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रु. १०,०४,६४०.०० (दहा लक्ष चार हजार सहाशे चाळीस रुपये फक्त) इतकी रक्कम Mr. Anil Sakhare Account number- ००४९१०१०००३७७०७, IFSC Code- BKID००००४९, MICR CODE- ४०००१३०५७ यांचे नांवे RTGS करण्यात यावी.

३. सदर रक्कम वितरित करण्याकरीता श्री. र.ग. बोडडू, कार्यासन अधिकारी (रोख शाखा) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच डॅा. सुदिन गायकवाड, उपसचिव (आस्थापना), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.व्ही-२, ३४५१-सचिवालयीन आर्थिक सेवा ( ०९० ) सचिवालय ( ०१ ) ( ०१ ) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग ( दत्तमत्त ) ( ३४५१ ०३०४ )२८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी वाचा क्र. ३ येथील आदेशान्वये पुनर्विनियोजनेद्वारे प्राप्त झालेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा .

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग दोन अनु. क्र. ४९ नियम क्र. १६६ अन्वये प्रशासकिय विभागांना असलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३३१२१००४७९६०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Anil Jayaram Choudhary

Digitally signed by Anil Jayaram Choudhary
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, serialNumber=d124ae9bbd15bed87dbd08ef779cf1b85a4020339eb1c2ef0e112fb67063011c, cn=Anil Jayaram Choudhary
Date: 2017.03.31 21:06:10 +05'30'

(अनिल ज. चौधरी)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

1. मा. अपर मुख्य सचिव (सहकार), सहकार,पणन व वस्त्रोद्योग, विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक
2. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा ) महाराष्ट्र-१,मुंबई
3. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
4. अवर सचिव (१७-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग, विभाग, मंत्रालय , मुंबई ३२.
5. कक्ष अधिकारी (रोख शाखा) सहकार,पणन व वस्त्रोद्योग, विभाग, मंत्रालय यांना पुढील योग्य त्या कार्यवाहीसाठी
6. वित्त विभाग कार्या.व्यय- २ व अर्थ -१३,मंत्रालय
7. ॲड. अनिल साखरे,२०,मेडोज हाऊस,चौथा मजला,अंकुर हॉटेलच्यावर ,३९,नगीनदास मास्तर रोड,फोर्ट,मुंबई-४०० ०२३.
8. निवडनस्ती १३-स.